# पुस्तकांचा तास

लेखक : ऐन



# पुस्तकांचा तास



मराठी : गार्गी लागू



Drop Everything Its D E A R time!

अवांतर कामे नंतर करा, दमू नका फार,

पुस्तकांच्या तासात वाचन करून, आनंद मिळवा छान!

आज शाळेत अगदी रोजच्यासारखा दिवस होता.

फ्रिमन बाईंच्या वर्गात मुलं दगडाच सार बनवित होती. डेनिसने सारात गाजरं घातली आणि विचारलं, "पुस्तकांचा तास कधी सुरू होणार?"

वोंग गुरुजी समुद्रातील जीवसृष्टीबद्दल माहिती करून देत आहेत.

क्रसने पाण्यात सूर मारला आहे.

"पुस्तकांचा तास कधी सुरू होणार?" त्याने विचारले.



अंजलीबाईंच्या वर्गातील मुल "मेफ्लावर" जहाजातून प्रवास करीत आहेत. शेरान ओणवी होऊन उलटी करण्याचे नाटक करते आहे, जसे पूर्वी तिर्थयात्रेला निघालेले यात्री करीत असत. "पुस्तकांचा तास कधी सुरू होणार?" तिने विचारले.

मुलिगन बाईंच्या वर्गात मुलं राष्ट्रपतिवर नाटक करीत आहेत. होसे त्यामधे 'जार्ज वाशिंग्टन' बनला आहे. त्याचा केसाचा टोप खूप मोठा आहे. "पुस्तकांचा तास कधी सुरू होणार?" होसेने विचारले.





संगिताच्या वर्गात मुलं वाद्य वाजवित आहेत. बासरी आणि तबल्याच्या आवाजात रंगून गेले आहेत. वर्गांत इतका आवाज आहे की गार्सोआ गुरूजींना कानांत कापसाचे बोळे कोंबावे लागतात.

खेळाच्या वर्गात मुले बास्केटबाल खेळत आहेत.



कला-वर्गात एनी रंगकाम करते आहे
आणि जानी ओल्या मातीची खेळणी बनवितो आहे.



स्वयंपाक घरातून
बिस्किट भाजल्याचा
खमंग वास येत आहे.



मुख्याध्यापकांच्या
खोलीत, मुख्याध्यापक
मि. चार्ल्स जिमीला रागे
भरीत आहेत.



मार्टिन मिस्त्री शाळेच्या
तळघरात नळाचे वाशर
बदलण्याचे काम करीत
आहे.



ग्रंथालयात पुस्तके कपाटातून
खाली पडत आहेत.



विज्ञान प्रयोगशाळेत ज्वालामुखीच्या प्रयोगात ज्वालामुखी जागृत झाला आहे.



संगणक वर्गात पिटने चुकून जुनीच डिस्क संगणकात घातली आहे.



प्राथमिक उपचार कक्षामधे परिचारिका तनिका एका लहान मुलीला झालेल्या जखमेवर पट्टी बांधत आहे.

शाळेत आजही सर्वजण नेहमीसारखेच व्यस्त आहेत.

पण मग......

सर्व काम बाजूला ठेवा....
पुस्तकांचा तास सुरू झाला.....



**DEAR = DROP EVERYTHING AND READ**



आपल्याला आवडलेले पुस्तक वाचा....



पातेल्यातील सार उकळत आहे.

पण वर्गातील सर्व मुले पुस्तक वाचत आहेत.

शार्कने आपला मोठा जबडा उघडून "आ" वासला आहे.
पण वोंग बाईंच्या वर्गातील सर्व मुले
पुस्तकाची पाने उलटत आहेत.

"मेफ्लावर" जहाज समुद्रातून हळूहळू पुढे सरकत आहे.
मुलं तेव्हा पुस्तके वाचत असतात.

नाटकातील होसेचा टोप खाली पडतो तेव्हा मुलियन बाईंच्या वर्गातील मुलांचे चेहेरे पुस्तकात लपलेले असतात.

संगिताचा वर्ग आता शांत आहे. नाही बासरी ना तबल्याचा आवाज!
गार्सिओ आता कानात कोंबलेले कापसाचे बोळे फेकून देतात.



खेळाचा वर्गही आता शांत आहे.
बास्केटबाल खेळ बंद आहे.

कला-कक्षामधे चित्र अर्धवट रंगवून झाले आहे.
ओली माती सुकून गेली आहे.



स्वयंपाकघरातील भट्टी थंड झाली आहे.



मुख्याध्यापकांनी रागावणे बंद केले आहे.



मिस्त्रिनेहि त्याचे काम बंद केले आहे.



वाचनालयात ग्रंथपालाने पुस्तके आवरणे बंद केले आहे.



विज्ञान कक्षामधून ज्वालामुखीतून धूर येणे बंद झाले आहे.



संगणक आता 'स्लिप मोड' वर आहे.



परिचारिका तनिकाने पट्टी बांधणे बंद केले आहे.



शाळेत सर्वजण पुस्तके वाचत आहेत.



सर्व कामे बंद करून पुस्तके वाचण्यासाठी ठेवलेला वेळ.....



**DEAR = DROP EVERYTHING AND READ**



हा सर्वात मजेदार तास आहे....

हा तास उद्याही असेल.....

आणि परवा सुध्दा....




आणि त्यानंतरसुध्दा......

## DEAR = DROP EVERYTHING AND READ



प्रत्येक शाळेत पुस्तकांच्या तासाचे महत्व पटलेले आहे.
या तासाला सर्वजण आपल्या आवडीची पुस्तके वाचतात.